श्री. आनंद लोमटे यांना मानीव दिनांक मंजूर करण्याबाबत आणि अनुषंगीक वेतन व भत्ते थकबाकीसह अनुज्ञेय ठरविण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- मानीव-२०१७/प्र.क्र.६०/महामंडळे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १४ जून, २०२४.

**संदर्भ :-** १) श्री. आनंद लोमटे, उपमहाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळ मर्या. यांचे दि.२२/१/२०१३ व ३/५/२०१८ चे निवेदन.
२) व्यवस्थापकीय संचालकाचे पत्र क्र.इमाविवि-२०१९/प्रशासन/१२३५, दि.१६/३/२०१९.
३) व्यवस्थापकीय संचालकाचे पत्र क्र.इमाविवि-२०२०-२१/प्रशासन/मानीव दिनांक/२२२, दि.२८/८/२०२०.
४) या विभागाचा शासन निर्णय क्र.मानीव-२०१७/प्र.क्र.६०/महामंडळे, दि.३०/८/२०२३.
५) व्यवस्थापकीय संचालकाचे पत्र क्र.इमाविवि-२०२३/प्रशासन/७६२, दि.४/९/२०२३.
६) या विभागाची पत्र क्र.मानीव-२०१७/प्र.क्र.६०/महामंडळे, दि.१२/१०/२०२३ चे पत्र व सोबतचा अहवाल .
७) व्यवस्थापकीय संचालकाचे पत्र क्र.इमाविवि-२०२३/प्रशासन/९४१, दि.१३/१०/२०२३.

**प्रस्तावाना** :-

महाराष्ट्र राज्य वस्त्रोद्योग महामंडळामधील श्री. मंगेश शिंदे यांना Labour Welfare Officer या पदावरुन महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळामध्ये सहाय्यक व्यवस्थापक (रु.२०००-३५००) या पदावर दि.२/११/२००२ पासून प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्यात आली. तद्नंतर श्री. शिंदे यांना दि.३१/१२/२००३ पासून महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळ मर्या. मध्ये कायमचे समावेशन करण्यात आले. महामंडळाचे दि.३१/१२/२००३ च्या आदेशान्वये श्री. शिंदे यांना सहाय्यक व्यवस्थापक या पदावर रु. ३०००-४५०० या वेतनश्रेणीत शासन मान्यतेच्या अधिन राहून तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात आली.

२. सहाय्यक महाव्यवस्थापक / जिल्हा व्यवस्थापक या संवर्गाचे दि.१/१/२००४ रोजीचे तात्पुरते सेवाजेष्ठता सुचीनुसार श्री. आनंद लोमटे यांचा जेष्ठता क्रमांक १ असून श्री. मंगेश शिंदे यांचा जेष्ठता क्रमांक ३२ आहे. तथापि, श्री. मंगेश शिंदे यांना उपमहाव्यवस्थापक या पदावर दि.३१/१२/२००३ रोजी पदोन्नती देण्यात आली. अशाप्रकारे श्री. लोमटे हे श्री. मंगेश शिंदे यांना सेवा जेष्ठ असूनही श्री. लोमटे यांना चुकीने अधिक्रमीत करुन श्री. शिंदे यांना उपमहाव्यवस्थापक या पदावर पदोन्नती देण्यात आली. त्यामुळे श्री. मंगेश शिंदे यांच्या उपमहाव्यवस्थापक पदावरील पदोन्नतीमुळे व्यथित होऊन श्री. लोमटे यांनी श्री. मंगेश शिंदे यांच्या उपमहाव्यवस्थापक पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक म्हणून दि.३१/१२/२००३ ही तारीख देण्याची संदर्भाधिन क्र. १ येथील पत्रान्वये विनंती केली होती. महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळाने दि.८/५/२०२३ च्या पत्रान्वये इतर संवर्गासह सहाय्यक महाव्यवस्थापक / जिल्हा व्यवस्थापक या संवर्गाचे सेवाजेष्ठता यादीस मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव या विभागाकडे पाठविलेला आहे.

३. उपमहाव्यवस्थापक हे पद सहाय्यक महाव्यवस्थापक / जिल्हा व्यवस्थापक या पदास महामंडळाच्या पदोन्नतीच्या श्रृंखलेमध्ये वरीष्ठ पद आहे. महामंडळाच्या आस्थापनेवर उपमहाव्यवस्थापकाचे २ मंजुर पदापैकी एक पद सरळसेवा भरतीने आणि एक पद पदोन्नतीने भरण्यात येते. अशाप्रकारे, उपमहाव्यवस्थापक या पदावर पदोन्नतीने नेमणूकीसाठी एक पद उपलब्ध असल्याने सदर पद एकाकी पद असल्याने या पदास आरक्षण लागू नाही.

४. श्री. लोमटे यांच्या विनंतीच्या अनुषंगाने आणि महामंडळाच्या दि.८/५/२०२३ च्या पत्राच्या अनुषंगाने या विभागाकडून महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळातील कर्मचारी श्री. आनंद लोमटे,

उपमहाव्यवस्थापक यांना मानीव दिनांक मंजूर करण्याबाबत व अनुषंगीक लाभ अनुज्ञेय करण्याबाबत या विभागाच्या दि.३०/८/२०२३ च्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली. सदर समितीची दि.४/९/२०२३ रोजी झालेल्या बैठकीमध्ये श्री. आनंद लोमटे यांच्या मानीव दिनांक देण्याच्या प्रस्तावावर सर्वकष विचार करण्यात आला आणि सदर समितीने दि.१२/१०/२०२३ रोजी अहवाल सादर केलेला आहे.

५. सामान्य प्रशासन विभागाचे दि.२३/१२/२००२ अन्वये पदोन्नतीसाठी गोपनीय अहवालाची किमान प्रतवारी निश्चित करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार महामंडळातील उपमहाव्यवस्थापक या पदासाठी गोपनीय अहवालाची सरासरी प्रतवारी किमान “ब” आहे.

६. श्री. आनंद लोमटे यांची सहाय्यक महाव्यवस्थापक / जिल्हा व्यवस्थापक या पदावर दि.१/१२/२००३ रोजी नेमणूक झालेली आहे. श्री. लोमटे यांची निम्न पदावर दि.१/१२/२००६ रोजी ३ वर्षे पूर्ण होतात. सामान्य प्रशासन विभागाचे दि.२५/८/१९८८ च्या परीपत्रकान्वये पदोन्नतीसाठी निम्न पदावर किमान ३ वर्षाची सेवेची अट विहित करण्यात आली. त्यामुळे श्री. लोमटे यांचा उपमहाव्यवस्थापक या पदावरील पदोन्नतीसाठी २००६-०७ या निवड सुचीवर्षी दि.४/९/२०२३ च्या बैठकीत विचार करण्यात आला. परिणामी दि.३१/३/२००६ पुर्वीचे लगतच्या ५ वर्षाचे (दि.१/१/२००० ते दि.३१/३/२००७) गोपनीय अहवाल विचारात घेण्यात आले आहे आणि सहाय्यक महाव्यवस्थापक / जिल्हा व्यवस्थापक या संवर्गाचे दि.१/१/२००६ ची जेष्ठता यादी विचारात घेण्यात आली आहे.

७. श्री. लोमटे यांचे उपमहाव्यवस्थापक या पदावरील गोपनीय अहवालाची सरासरी “अ” असल्याने श्री. लोमटे हे उपमहाव्यवस्थापक पदावर सन २००६-०७ या वर्षाच्या निवडसुचीमध्ये पदोन्नतीसाठी पात्र ठरतात.

८. श्री. लोमटे यांना उप महाव्यवस्थापक या पदावर वरील प्रमाणे मानीव दिनांक अनुज्ञेय ठरविल्यानंतर त्याअनुषंगाने वेतन व भत्ते याचा फायदा थकबाकीसह देण्याबाबत शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग ज्ञापन क्र.एसआरव्ही-१०६४-डी, दि.२५/२/१९६५, शासन परिपत्रक सा.प्र.वि. ज्ञापन क्र.एसआरव्ही/१०८२/बारा, दि.१४/९/१९८२ आणि शासन निर्णय सा.प्र.वि. क्र.एसआरव्ही-२००१/३६२/ प्र.क्र.२१/२००१/बारा, दि.२९/१०/२००१ या मधील तरतुदीनुसार श्री. लोमटे यांना उप महाव्यवस्थापक या पदावरील मानीव दिनांक दि.१/१/२००७ पासून वेतन व भत्त्याचा फायदा थकबाकीसह अनुज्ञेय ठरतो.

९. सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/व्हीआयपी-२१०/प्र.क्र.४१२/का.१२, दि.२१/८/२०१५ आणि परिपत्रक क्र.एसआरव्ही-२००२/प्र.क्र.२/२००२/१२, दि.६/६/२००२ मधील निर्णयानुसार गट-ब (अराजपत्रीत), गट-क व गट-ड या संवर्गातील पदावर पदोन्नतीचे मानीव दिनांक प्रदान करण्याचे अधिकार मंत्रालयीन विभागाच्या सचिवांना आहेत. महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळाचे कर्मचारी हे राजपत्रीत अधिकारी नाहीत. त्यामुळे या महामंडळातील कर्मचाऱ्यांना मानीव दिनांक देण्याचे अधिकार या विभागाच्या सचिवांना आहेत.

१०. तसेच, सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक ज्ञापन क्र.एसआरव्ही/१०८२/बारा, दि.१४/९/१९८२ संबंधित कर्मचाऱ्यास मानीव दिनांकाच्या परिणामी वेतन व भत्ते यांचा फायदा थकबाकीसह अनुज्ञेय ठरविण्यात आलेला आहे.

११. उपरोक्त वस्तुस्थितीच्या पार्श्वभुमीवर या प्रकरणी श्री. आनंद लोमटे यांना उपमहाव्यवस्थापक या पदावरील मानीव दिनांक आणि अनुषंगीक वेतन व भत्त्याचा फायदा थकबाकीसह अनुज्ञेय ठरविण्याबाबतचा प्रस्ताव या विभागाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-**

श्री. आनंद लोमटे हे सहाय्यक व्यवस्थापक / जिल्हा व्यवस्थापक या पदावर श्री. मंगेश शिंदे यांना सेवाजेष्ठ असूनही श्री. लोमटे यांना उपमहाव्यवस्थापक या पदावर पदोन्नतीच्या वेळी अधिक्रमित करण्यात आलेली आहे. त्यामुळे या प्रकरणी शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

१) श्री. आनंद लोमटे यांना उपमहाव्यवस्थापक या पदावरील दि.१/१/२००७ हा मानीव दिनांक मंजूर करण्यात येत आहे.

२) श्री. आनंद लोमटे यांना उपमहाव्यवस्थापक या पदावरील दि.१/१/२००७ च्या पदोन्नतीच्या मानीव दिनांकापासून वेतन व भत्त्याचा फायदा थकबाकीसह अनुज्ञेय ठरविण्यात येत आहे.

३) श्री. लोमटे यांच्याविरुध्द वरील कालावधीत विभागीय चौकशी प्रलंबित नसल्याची खात्री करण्यात यावी.

४) श्री. लोमटे यांना वरीलप्रमाणे अदा केलेली रक्कम लेखाआक्षेप किंवा अन्य कारणामुळे वसूल करावी लागल्यास सदर रक्कम सहव्याज परत करण्यास तयार असल्याबाबत श्री. लोमटे यांच्याकडून किमान एक कर्मचाऱ्याच्या साक्षीदारासमक्ष नोटरीकृत बंधपत्र घेण्यात यावा.

२. सहाय्यक महाव्यवस्थापक / जिल्हा व्यवस्थापक या संवर्गाची तात्पुरती जेष्ठता यादी प्रसिध्द करुन त्यावर १५ दिवसाच्या आत हरकती व सुचना मागविण्यात यावी आणि पुढील १५ दिवसात या संवर्गाची जेष्ठता यादी अंतीम करण्यात यावी. त्यानंतर श्री. लोमटे यांना वरील प्रमाणे अनुज्ञेय ठरविण्यात आलेल्या मानीव दिनांकाच्या अनुषंगाने वेतन व भत्त्याचा फायदा थकबाकीसह पुढील एक महिन्याच्या आत अदा करण्यात यावा आणि अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०६१४१३३१२९५०३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसान व नावाने,

VAISHALI DATTATRAYA FULSUNDAR

Digitally signed by VAISHALI DATTATRAYA FULSUNDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=00e21046f4f20f3438928047553b9a3968c8ec5276af8883c74ff066482ba683, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=035AD3AC42B3CB2D7153EB07CA4987F4C28AA8B52BAD8A330512FC5DF5D5B426, cn=VAISHALI DATTATRAYA FULSUNDAR
Date: 2024.06.14 13:47:01 +05'30'

**( वै. द. फुलसुंदर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेता), मुंबई.
३) सामान्य प्रशासन विभाग/१२, मंत्रालय, मुंबई-३२.
४) प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळ मर्या. मुंबई.
६) कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) निवड नस्ती, का.क्र.महामंडळे, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.